जल जीवन मिशन अंतर्गत पाणी गुणवत्ता संनियंत्रण व सर्वेक्षण आणि सहाय्यिकृत बाबी घटकाखालील राज्य हिश्श्याचा निधी राज्य पाणी व स्वच्छता मिशनला वितरित करणेबाबत (लेखाशीर्ष २२१५ ९९७१ -राज्य हिस्सा)

महाराष्ट्र शासन
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
**शासन निर्णय क्रमांकः जजीमी-२०२२/प्र.क्र.७४०/पापु १०**
सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल,मंत्रालय
क्रॉफर्ड मार्केट जवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई
तारीख: ३१ मार्च,२०२३

वाचा-

१.शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.जजीमि -२०१९/ प्र.क्र.१३८/ पापु १० (०७), दि.०४.०९.२०२०
२. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.बीयुडी २०२२/ प्र.क्र.११६/ पापु १०, दि.२३.०८.२०२२
३. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.जजीमि २०२२/ प्र.क्र.७४०/ पापु १०, दि.१३.१२.२०२२
४. केंद्र शासनाचे आदेश क्र.**W-11020/197/2015-Water-I/40,**दि.०९.०१.२०२३
५. शासन निर्णय, समक्रमांक दि.२०.०२.२०२३
६. केंद्र शासनाचे आदेश क्र.**W-11020/197/2015-Water-I/76,**दि.२७.०३.२०२३

प्रस्तावना-

संदर्भिय क्र.१ दि.०४.०९.२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्यात जल जीवन मिशन राबविण्याकरीता मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. जल जीवन मिशन कार्यक्रमांतर्गत केंद्र शासनामार्फत प्राप्त निधीपैकी २% निधी पाणी गुणवत्ता संनियंत्रण व सर्वेक्षण (WQMS) व ५% निधी सहाय्यिकृत बाबी (Support activities) या घटकाखाली स्वतंत्रपणे तरतूद करणेबाबत जल जीवन मिशनच्या मार्गदर्शक सूचनांमध्ये नमुद आहे. पाणी गुणवत्ता संनियंत्रण व सर्वेक्षण आणि सहाय्यिकृत बाबी घटकाकरीता केंद्र व राज्य वित्तीय आकृतीबंध ६०:४० असा आहे.

संदर्भिय क्र.४ च्या पत्रान्वये जल जीवन मिशन अंतर्गत चालु वित्तीय वर्षाकरीता केंद्र शासनाने पहिल्या हप्त्याच्या प्रथम भागाचा निधी दि.०९.०१.२०२३ रोजीच्या आदेशान्वये उपलब्ध करुन दिला होता. त्याअनुषंगाने सहाय्यिकृत बाबी घटकाकरीता (Support Activities) व पाणी गुणवत्ता संनियंत्रण व सर्वेक्षणाकरीता (WQMS) समरुप राज्य हिश्श्याचा निधी संदर्भिय क्र.२,३ व ५ च्या शासन निर्णयान्वये राज्य पाणी व स्वच्छता मिशनला वितरित करण्यात आले आहेत.

आता, केंद्र शासनाने संदर्भिय क्र.६ दि.२७.०३.२०२३ रोजीच्या आदेशान्वये प्रथम हप्त्याचा दुसरा भाग म्हणून रु.१९५७.८११४ कोटी इतका निधी राज्यास उपलब्ध करुन दिलेला आहे. त्यामध्ये सहाय्यिकृत बाबी घटकाखाली रु.९७.८९०६ कोटी तर पाणी गुणवत्ता संनियंत्रण व सर्वेक्षण घटकांतर्गत रु.३९.१५६२ कोटी इतका निधी उपलब्ध करुन देण्यात आला आहे. सदर घटकांतर्गत केंद्र व राज्य हिश्श्याचे वित्तीय आकृतीबंध ६०:४० असल्याकारणाने राज्य हिश्श्यांतर्गत सहाय्यिकृत बाबी घटकाखाली रु.६५.२६०४ कोटी तर पाणी गुणवत्ता संनियंत्रण व सर्वेक्षण घटकांतर्गत रु.२६.१०४१ कोटी इतका निधी देय होतो. सदरचा निधी राज्य पाणी व स्वच्छता मिशनला वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

जल जीवन मिशन अंतर्गत सन २०२२- २०२३ या आर्थिक वर्षामध्ये पाणी गुणवत्ता संनियंत्रण व सर्वेक्षण आणि सहाय्यिकृत बाबी घटकाखाली मागणी क्र. वाय-२, २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१, पाणी पुरवठा, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, ०२ जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२) (२९) जल जीवन मिशनकरीता सहाय्यीकृत बाबी व पाणी गुणवत्ता संनियंत्रण व सर्वेक्षणासाठी अर्थसहाय (राज्य हिस्सा) यासाठी अनुदाने, ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (२२१५ ९९७१) या लेखाशिर्षाखाली रु.९१,३६,४५,०००/- (अक्षरी-रु. एक्याण्णव कोटी छत्तीस लक्ष पंचेचाळीस हजार फक्त) इतका निधी वित्त विभागाने वितरणास उपलब्ध करुन दिला आहे. हा निधी राज्य पाणी व

स्वच्छता मिशनला जल जीवन मिशन कार्यक्रमांतर्गत सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीकरीता उघडण्यात आलेल्या राज्य नोडल खात्यामध्ये खालीलप्रमाणे वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | लेखाशीर्ष | घटक | रक्कम (रु.कोटी मध्ये) |
|---|---|---|---|
| १ | २२१५ ९९७१ (राज्य हिस्सा) | सहाय्यिकृत बाबी | ६५,२६,०४,०००/- (रुपये पासष्ट कोटी सव्वीस लक्ष चार हजार फक्त) |
| २ | २२१५ ९९७१ (राज्य हिस्सा) | पाणी गुणवत्ता संनियंत्रण व सर्वेक्षण व संनियंत्रण (WQMS) | २६,१०,४१,०००/- (रुपये सव्वीस कोटी दहा लक्ष ऐकेचाळीस हजार फक्त) |
| | | **एकुण** | **९१,३६,४५,०००/- (रुपये - एक्याण्णव कोटी छत्तीस लक्ष पंचेचाळीस हजार फक्त)** |

०२. राज्य पाणी व स्वच्छता मिशन (Jal Jeevan Mission Maharashtra Escrow Account) या नावाने उघडण्यात आलेल्या एच.डी.एफ.सी.बँक लिमिटेड, तलाव पाली, ठाणे (IFSC Code- HDFC०००0१४६) येथील खाते क्र.५०१००५३०८६०६०७ मध्ये जमा करण्यात यावा. हा निधी जमा झाल्यानंतर पुढील सर्व आवश्यक कार्यवाही मिशन संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन यांच्याद्वारे करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

०४. सदर रक्कम आहरित करण्यासाठी (पी.एफ.एम.एस. योजना केंद्र सांकेतांक ९१५० व राज्य सांकेतांक MH ३९९) आहरण व संवितरण अधिकारी म्हणून अवर सचिव (रोखशाखा) यांना व नियंत्रक अधिकारी म्हणून उप सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर रक्कम आहरण व संवितरण अधिकारी तथा अवर सचिव (रोखशाखा), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी एच.डी.एफ.सी.बँक लिमिटेड, तलाव पाली, ठाणे (IFSC Code- HDFC००००१४६) येथील खाते क्र.५०१००५३०८६०६०७ मध्ये जमा करावी.

०५. सदर तरतूद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या दि.०४.०४.२०२२ च्या शासन परिपत्रकात दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे अनौ.सं.क्र.१६६/ व्यय-३, दि.३०.०३.२०२३ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३३११००८३४७०२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ANUSHKA ANIRUDH DALVI

Digitally signed by ANUSHKA ANIRUDH DALVI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5edd45c6e1357ae0c8533741733e53bdac703b68fe52733dbcffe2914e0ac003, pseudonym=788F41926BA617FC3320DC8952A519D487C674CD, serialNumber=73F1FB9D6CBC3DAFBAD56FB8AD850EDE51730924E3CF0C7CD07F0DACC65316C5, cn=ANUSHKA ANIRUDH DALVI
Date: 2023.03.31 17:13:22 +05'30'

**(अनुष्का दळवी)**
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. उपसचिव (रोख शाखा), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
२. अवर सचिव (रोख शाखा), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई

यांना विनंती करण्यात येते की, वरीलप्रमाणे निधी तातडीने एच.डी.एफ.सी.बँक लिमिटेड, तलाव पाली, ठाणे येथील राज्य पाणी व स्वच्छता मिशनच्या खात्यात जमा करण्यात यावा.

**प्रत,**

१. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ मुंबई/ २- नागपूर
३. मिशन संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन, बेलापूर, नवी मुंबई

४. सह सचिव/ उप सचिव (अर्थसंकल्प), नियोजन व वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई
७. कार्यासन पापु-०४/२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
८. निवडनस्ती- कार्यासन पापु १०